बुलढाणा जिल्हयासाठीच्या वार्षिक योजनेअतंर्गत सन २०१०-११ या आर्थिक वर्षासाठी सामाजिक वनीकरण विभागाच्या "शासकीय रोपवाटिकांचे आधुनिकीकरण व बळकटीकरण" आणि "किसान रोपवाटिका" या दोन योजनांना तांत्रिक मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एसएलएफ-२०११/प्र.क्र.२९/जल-१२**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक : ११ मार्च, २०११**

**पहा :-**

१) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. जिवायो-१००७/प्र.क्र.३९/का-१४४४, दि. १६.२.२००८
२) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, बुलढाणा यांचे प्रशासकीय मान्यता आदेश क्र. जिनिस/संस./जिवायो/१०९०/२०१०९, दिनांक ०२/०९/२०१०
३) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, बुलढाणा यांचे निधी वितरणाचे आदेश क्र. जिनिस/का.१३/सांस/जिवाया १०-११/१३९६/१०, दिनांक २९/१०/२०१०
४) उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग, बुलढाणा यांचे पत्र क्र. सावंवि/योजना/७७७/२०१०-११, दिनांक २५/०२/२०११

**प्रस्तावना :-**

सामाजिक वनीकरण विभागातंर्गत राज्य योजनेमधून विविध स्तरावर वृक्ष लागवडीच्या योजना राबविण्यात येतात. परंतु, सदर योजनांच्या माध्यमातून वृक्ष लागवडीचे उद्दिष्ट पूर्ण करणे शक्य होत नाही. त्यामुळे बुलढाणा जिल्ह्यासाठीच्या वार्षिक योजनेंतर्गत सन २०१०-११ या आर्थिक वर्षासाठी "शासकीय रोपवाटिकांचे आधुनिकीकरण व बळकटीकरण" व "किसान रोपवाटिका" या दोन नवीन योजनांखालील चार कामांना जिल्हा नियोजन समिती, बुलढाणा यांनी रु. १२.१८६ लाख इतकी तरतूद उपलब्ध करुन दिली असून, सदर योजनांचा जिल्हा वार्षिक योजनांच्या आराखड्यात समावेश केला आहे. त्यानुसार सदर योजनांना तांत्रिक मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सदर शासन निर्णयान्वये बुलढाणा जिल्ह्यासाठीच्या वार्षिक योजनेतंर्गत सन २०१०-११ साठी सामाजिक वनीकरण विभागाच्या खाली नमूद केलेल्या दोन जिल्हास्तरीय योजनांच्या चार कामांना एकूण रु. १२.१८६ लाख इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता देण्यात येत आहे.

| क्र. | योजना | कामाचे नांव | भौतिक उद्दिष्ट गांव व तालुका | विभागाने सन २०१०-११ साठी प्रस्तावित केलेला नियतव्यय | जिल्हा नियोजन समितीने सन २०१०-११ साठी मंजूर केलेला नियतव्यय |
|---|---|---|---|---|---|
| १ | शासकीय रोपवाटिकांचे आधुनिकीकरण व बळकटीकरण | रोपवाटीकेत उंच रोपांची निर्मिती करणे | (१) ७५०० रोपे येळगांव, ता. बुलढाणा | रु. ३.४२८ लाख | रु. ३.४२८ लाख |
| | | | (२) ७५०० रोपे वायाळ, ता. जळगांव जामोद | रु. ३.४२९ लाख | रु. ३.४२९ लाख |
| | | | (३) ७५०० रोपे कोराडी, ता. मेहकर | रु. ३.४२९ लाख | रु. ३.४२९ लाख |
| २ | किसान रोपवाटीका | किसान रोपवाटीकेत रोपे तयार करणे | २,००,००० रोपे १३ लाभार्थी जि. बुलढाणा | रु. १.९०० लाख | रु. १.९०० लाख |
| | | | **एकूण :-** | **रु. १२.१८६ लाख** | **रु. १२.१८६ लाख** |

२. याबाबत खालील अटी/ शर्ती लागू राहतील.

१) सदर योजने संदर्भातील सविस्तर तांत्रिक मार्गदर्शक सूचना, कामांचा तपशिल व तपासणी यादी संचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, पुणे यांच्या स्तरावरुन निर्गमित करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

२) योजनांची अंमलबजावणी व संनियंत्रण संदर्भात उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग, बुलढाणा या कार्यान्वयन यंत्रणेकडून संदर्भ क्र. १ मधील नियोजन विभागाच्या दि. १६.२.२००८ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ६ मधील व परि. ७.६ मधील बाबींचे अनुपालन करण्यात यावे.

३) सदर योजनांसाठी जिल्हा वार्षिक योजनेंतर्गत प्रस्तावित नियतव्यय अर्थसंकल्पीत करुन निधी उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही जिल्हाधिकारी, बुलढाणा यांनी करावी.

४) या कार्यक्रमाखालील खर्च खालील लेखाशीर्षातून भागविण्यात यावा.

मागणी क्र. ओ - ४६.

२४०६, सामाजिक क्षेत्र व क्षेत्र वनीकरण,

(६४) (०२) मध्यवर्ती रोपमळे (२४०६ ७०७२)

(०२) मजुरी व (२१) पुरवठा व सामुग्री

५) याबाबत जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, बुलढाणा यांनी त्यांच्या प्रशासकीय मान्यता व निधी वितरणाच्या कार्यालयीन आदेशाद्वारे दिलेले निर्देश तथा अटी / शर्ती व वेळोवेळी दिलेले निर्देश लागू राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०११०३१५१९६४३५०००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,**

**( श्या. र. चौरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

सहसंचालक , सामाजिक वनीकरण वृत्त, कोकण- ठाणे / पुणे / नाशिक / औरंगाबाद /अमरावती / नागपूर

उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग, बुलढाणा

जिल्हाधिकारी कार्यालय, बुलढाणा

जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर

महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर

कार्यासन व्यय-१५, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

कार्यासन क्र.१४३३ / १४८१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

कार्यासन अधिकारी, जल-११ / जल-१९, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

निवडनस्ती / जल-१२ कार्यासन